केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत कार्यक्रमांसाठी सामाजिक विशेष घटकाकरीता (SCSP) सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील तरतुदीतून केंद्र हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G५९२ अंतर्गत रु.२७४८.०० लक्ष व राज्य हिश्श्यापोटी लेखाशिर्ष २२१०G६०९ अंतर्गत रु.१८३२.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः बियुडी-१३२१/प्र.क्र.२३/२१/आरोग्य-७

१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१.
दिनांक : १९ जानेवारी, २०२२.

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक २४.०६.२०२१.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दिनांक १४.१०.२०२१.
३) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/ कें.रा.हि/८७६७४-६८१/२०२१-२२, दिनांक ०२.१२.२०२१.
४) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे क्र. राआसोम/ एफएमजी/ कें.रा.हि/१०२४८७/२०२१-२२, दिनांक १५.१२.२०२१.
५) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्र.बीजीटी-२०२१/प्र.क्र.०२/ अर्थसंकल्प (विघयो), दिनांक १४.०१.२०२२.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह, सर्व प्रकारच्या गरजूंना आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले. सन २०१४-१५ मध्ये केंद्र शासनाने आरोग्य विषयक सर्व केंद्र पुरस्कृत योजना एकत्रित करुन त्यास "राष्ट्रीय आरोग्य अभियान" असे नाव दिले. या राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत आता राष्ट्रीय आरोग्य अभियान, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान व राष्ट्रीय रोग नियंत्रण कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनांचा समावेश केला आहे. राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता सामाजिक घटकासाठी (SCSP) निधी सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीय तरतुदीतून सन २०२१-२२ करिता केंद्र व राज्य हिस्सा राज्य आरोग्य सोसायटीस उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. प्रस्तुत प्रकरणी आता पर्यंत वितरीत करण्यात आलेल्या अनुदानाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

(रुपये लाखात)

| अ .क्र. | शासन निर्णय क्रमांक व दिनांक | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय + पुरक मागणीद्वारे तरतूद ६०% केंद्र हिस्सा | वितरीत केंद्र हिस्सा | सन २०२१-२२ ची अर्थसंकल्पीय + पुरक मागणीद्वारे तरतूद ४०%राज्य हिस्सा | वितरीत राज्य हिस्सा |
|---|---|---|---|---|---|
| A | शा.नि.क्र. बियुडी १३२१/प्र.क्र.२३ /२१ / आ७-, दि. २३.०७.२०२१ | २९०४७.६६ | ११०८७.०१ | १८८००.०० | ८३२०.४३ |
| | शा.नि.क्र. बियुडी १३२१/प्र.क्र.२३ /२१ / आ-७, दि. ०२.१२.२०२१ | -- | -- | | १६७०.४६ |
| B | **एकूण वितरीत अनुदान -:** | | **११०८७.०१** | | **९९९०.८९** |
| C | **वितरणासाठी उपलब्ध तरतूद** | | **१७९६०.६५** | | **८८०९.११** |

**<u>शासन निर्णय :-</u>**

उपरोक्त वाचा मधील क्र.३ व ४ येथील पत्रान्वये संचालक, वित्त व लेखा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी सन २०२१-२२ करिता केंद्र व राज्य हिस्सा अनुक्रमे रु.२७४८.०० लक्ष व रु.१८३२.०० लक्ष एवढा निधी सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीतून वितरित करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला होता. त्यास अनुसरुन उपरोक्त वाचा अ.क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाने सन २०२१-२२ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून केंद्र हिश्श्याचे २२१०G५९२ या लेखाशिर्षाखाली रु.२७४८.०० लक्ष व राज्य हिश्श्याचे २२१०G६०९ या लेखाशिर्षाखाली रु.१८३२.०० लक्ष इतका निधी सार्वजनिक आरोग्य विभागास अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) उपलब्ध करुन देण्यास मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने २२१०G५९२ या केंद्र हिश्श्याच्या लेखाशिर्षाखाली उर्वरित उपलब्ध रु.१७९६०.६५ लक्ष तरतूद शिल्लक असून त्यातून रु.२७४८.०० लक्ष व २२१०G६०९ या राज्य हिश्श्याच्या लेखाशिर्षाखाली रु.८८०९.११ लक्ष तरतूद शिल्लक असून त्यातून रु.१८३२.०० लक्ष इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी वितरणाचा तपशील पुढीलप्रमाणे आहे:-

(रु. लाखात)

| अ.क्र. | तपशील | सन २०२१-२२ ची मुळ व पुरक मागणीद्वारे अर्थसंकल्पीय तरतूद | मागणी रक्कम (६०% केंद्र हिस्सा / ४०% राज्य हिस्सा) |
|---|---|---|---|
| १ | एन-३, २२१० - सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना,<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०५) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान<br>(केंद्र हिस्सा ६० %) (कार्यक्रम) | २९०४७.६६ | २७४८.०० |

| अ.क्र. | तपशील | सन २०२१-२२ ची मुळ व पुरक मागणीद्वारे अर्थसंकल्पीय तरतूद | मागणी रक्कम (६०% केंद्र हिस्सा / ४०% राज्य हिस्सा) |
|---|---|---|---|
| | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१०G५९२) | | |
| २ | एन-३, २२१० - सार्वजनिक आरोग्य, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना,<br>(०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०६) राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान<br>(राज्य हिस्सा ४० %) (कार्यक्रम)<br>३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) (२२१०G६०९) | १८८००.०० | १८३२.०० |

२. सदरचा खर्च वर तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे संबंधित लेखाशीर्षाखालील सन २०२१-२२ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

३. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय , मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करून विहित केलेल्या बाबींवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी, मुंबई यांच्याकडे सुपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तींची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे. त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्टातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर

प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

५. सदरचे अनुदान सशर्त असून वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/ प्र.क्र.८५/ २०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

६. सदर प्रस्तावावरील खर्च शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक. ११४१/व्यय-१४, दिनांक ०४.०१.२०२२ व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग अनौ.सं.क्र. ९/SJSA, दिनांक ११.०१.२०२२ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्र.२०२२०१०७१३३८५४०५१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2022.01.20 14:14:22 +05'30'

(वि. ल. लहाने)

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा ), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.

३. आयुक्त (आरोग्य सेवा) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे .
६. सहाय्यक संचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१०. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग(अर्थसंकल्प/विघयो), मंत्रालय, मुंबई.
११. वित्त विभाग (व्यय-१४/ अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग .
१३. निवडनस्ती (आरोग्य-७) .